# पॉल रेवरे



पॉल रेवरेचा जन्म १जानेवारी, १७३५ रोजी बोस्टन, मॅसाच्युसेट येथे झाला. नऊ भावंडांपैकी ते एक होते. त्यांनी आपल्या वडिलांच्या चांदीचे दागिने बनविण्याच्या दुकानात काम केले. २१ वर्षाचे असतांना  ते फ्रांन्स आणि इंडियन्स यांच्याबरोबर झालेल्या युध्दमधे लढले. नंतर दागिने बनविण्याशिवाय इतरही व्यवसाय शिकले. त्यांचे दोनवेळा लग्न झाले व त्यांना १६ मुले झाली.

पॉल रेवरे यांनी चहा व अन्य वस्तुवर इंग्लंडने लावलेल्या करावर निषेध व्यक्त केला. ते 'बोस्टन टी-पार्टी' मधे सहभागी झाले. एका ब्रिटिश जहाजावर चढून चहाचे खोके समुद्रात फेकून देण्यात त्यांनी मदत केली. १८ एप्रिल, १७७५ ला मॅसाच्युसेटमधील लेक्सिंगटनमधे त्यांनी अमेरिकन सैनिकांना ब्रिटिश सैनिकांवर हल्ला करण्यास उद्युक्त केले. त्यामुळे इतिहासांत त्यांची बहुमोल नोंद झाली.

पॉल रेवरे यांना आज 'महान अमेरिकन देशभक्त ' म्हणून ओळखतात, ज्यांनी आपल्या देशाला स्वातंत्र मिळवून देण्यास मदत केली.

पॉल रेवरेचा जन्म बोस्टन बंदराच्या किनार्यावरील फिश स्ट्रिट वरील एका छोट्या, खूप माणसे असलेल्या घरांत झाला. पॉल आणि डोबोराय रेवरे या दांपत्याचा तो दुसरा मुलगा होता. त्यांना इतर नऊ बहिण - भाऊ होते. त्यांचा जन्म १७३५ नव वर्षांत झाला.





पॉल यांचे सुरवातीचे शिक्षण " शिशु विद्यालयात" झाले. तिथे त्यांनी "कृपया", "आभारी आहे" हे शब्द व चांगल्या वर्तवणूकीचे धडे शिक्षकाकडून घेतले. नंतर ७/८ वर्षाचे झाल्यावर ते नार्थ रायटिंगला गेले. ती फक्त मुलांची शाळा होती. तिथे ते अंकगणित, वाचन व लेखन देखिल करायला शिकले.


१३ वर्षाचे झाल्यावर पॉल रेवरे यांनी आपल्या वडिलांच्या दुकानात काम कराण्यासाठी शाळा सोडली. त्यांचे वडिल चांदीच्या दागिन्यांचे व्यापारी होते. ते १५ वर्षाचे असतांना इतर मुलांना बरोबर घेऊन क्राइस्ट चर्चमधील ८ मोठ्या घंटा वाजविण्यासाठी एक ग्रुप बनविला. असे सांगतात की पूर्ण अमेरिकन  चर्चमधील घंटामधे या घंटाचा आवाज सर्वात जास्त मधुर होता.

१७५४ मधे, पॉल रेवरे यांच्या वडिलांचे निधन झाले. त्येवेळी पॉल १९ वर्षाचे होते. भावंडात मोठे असल्यामुळे आई, बहिणी-भावंडांची जबाबदारी घेणे त्यांचे कर्तव्यच होते. त्यांचे लहान भाऊ, था॑ॅमस याच्याबरेबर त्यांनी वडिलांच्या दुकानात काम करायला सुरवात केली.





पॉलच्या लहानपणी मॅसाच्युसेट ग्रेट ब्रिटनच्या नियंत्रणाखाली होते. मॅसाच्युसेट १३ अमेरिकन राज्यापैकि एक होते. उत्तर व पश्चिमेकडिल राज्यावर फ्रान्सचे अधिपत्य होते. १६८९ च्या सुरवातीला ब्रिटिश व फ्रान्सच्या सैनिकामधे सिमेवर लढाई झाली जी " फ्रान्स-इंडियन युध्द" म्हणून प्रसिध्द आहे. अमेरिकेतील मूळ निवासी - इंडियन दोन्ही बाजूनी लढले.



१७५६ च्या फेब्रुवारीमधे फ्रेंच सौनिकांबरोबर लढण्यासाठी पॉल रेवरे मॅसेच्युसेट रेजिमेंटमधे दाखल झाले. न्यूयार्कच्या लेक जाॅर्ज पासून ते फोर्ट विल्यम हेनरी पर्यत ते लेफ्ट- राइट करत गेले. पॉल रेवरेच्या रेजिमेंटने मामुली लढाई लढली. म्हणावा तसा विजय मिळाला नाही. सैनिक लढाई करतांना मेले त्यापेक्षा जास्त सैनिक आजारी पडून मेले. १७३६ च्या नोव्हेबरमधे पॉल रेवरे सहित सर्व सैनिकांना घरी पाठवून दिले.



पॉल आपल्या दुकानात काम करण्यासाठी परत आले. ते अत्यंत कुशल कारागिर होते. आठवड्यातील ६ दिवस ते कामात व्यस्त रहात असत. चांदीची चहाची किटली, कानातील झुमके, बुटाची बक्कलस्, घड्याळाच्या फ्रेम, मुलांसाठी खुळखुळे, कुत्र्यासाठी साखळी, अश्या अनेक गोष्टी बनवित असत. रविवारी मात्र चर्चमधे नियमित जात असत.



चर्चमधे पॉल, सारा आरनेला भेटले. चर्चमधे धर्मगुरु उपदेश करीत असतांना पॉल साराकडेच पहात राहिले. काही काळानंतर त्यांची मैत्री झाली व आगस्ट १७५८मधे त्यांनी लग्न केले.



सारा, पॉल परिवाराबरोबर फिश स्ट्रिट वरील घरात रहायला आली. त्या छोट्या घरात जास्तच गर्दी झाली कारण आता पॉल आणि साराची मुलं आली. त्यांना एकूण आठ मुल झाली. १७५८ पासून दर दोन वर्षानी पाळणा हालत होता. जेव्हा इस्ना समवेत दोन मुलांचा मृत्यू झाला त्या वेळी इस्ना फक्त नउ महिन्याची होती. तिचा जन्मच फार मुश्किल होता कारण इस्नाच्या जन्मानंतर पाच महिन्यातच सारा मृत्यू पावली.



पत्नीच्या मृत्युनंतर उन्हाळ्यात पॉलची ओळख राहेल वाकरबरोबर झाली. पॉल आपल्या मुलांची देखभाल करण्यासाठी घाईने घरी जात असे तेव्हा राहेल त्याची मदत करण्यासाठी जात असे. राहेल एक प्रेमळ आणि कर्तबगार महिला होती. पॉलला ती प्रिय झाली. २३ सप्टेंबर १७७३ मधे त्याचा विवाह झाला. त्यानाही आठ मुल झाली. त्यातील तीन मुल लहानपणीच मरण पावली.



एव्हढ्या मुलांचे पालन पोषण व्यवस्थित करणे हे पॉल रेवरे यांना निश्चित करायचे होते. चांदीच्या वस्तु फक्त श्रीमंत लोकच खरेदी करू शकतात. मग पॉलने इतर व्यावसायिक गोष्टी शिकून घेतल्या. व त्याला अनुसरून काम करायला सुरवात केली. दात स्वच्छ करणे, नकली दात तयार करणे या गोष्टी आत्मसात केल्या. तांब्याच्या ताटल्या तयार करून त्यावर नक्षी काढणे, चित्र काढणे, व्यावसायिक कार्ड तयार करणे या गोष्टी शिकून घेतल्या. छत्र्या दुरुस्त करणे, चश्मे तयार करणे ही कामेही पॉल करू लागला.



पॉल आपल्या कामात व्यस्त होता. १७६० च्या सुरवातीला त्याने राजकारणात लक्ष घालायला सुरवात केली. पॉल " सन्स आॅफ लिबर्टी" या संस्थेचा सदस्य झाला. अमेरिकन लोक व ब्रिटिश शासन यांच्या विरोधात ही संस्था होती.

१७६३ पर्यत युध्द संपले पण अजूनही राज्यामधे ब्रिटिश सैनिक होते. मार्च १७६५ मधे या सैनिकासाठी ब्रिटिश संसदेने स्टॅम्प नियम आमलात आणला. यायोगे वर्तमानपत्र व छापिल प्रकाशनावर कर लावला होता.



ब्रटिश संसदेत राज्याचा कोणी प्रतीनिधी नव्हता. त्यामुळे कर लावणे उचित नाही असे त्यांचे मत होते. "प्रतिनिधीत्व नाही तर करही नाही" - पॉलने म्हटले. " सन्स आफ लिबर्टी" संस्थेने करविरोधात केलेल्या प्रदर्शनाचे नेतृत्व त्यांनी केले. १७६६ मधे स्टॅम्प कर रद्द करण्यात आला. पण पुढील वर्षी ब्रिटिश संसदेने टाउनशेड नियम आमलात आणला त्यामुळे कांच, शिस, रंग, कागद आणि चहा या गोष्टीवर कर आकारला जाऊ लागला.

५ मार्च १७७० रोजी ब्रिटनने चहा सोडून सर्व वस्तुवरील कर रद्द केला. त्याच दिवशी बोस्टनमधे किंग स्ट्रिटवर ब्रिटिश सैनिकाबरोबर लढाई झाली. राज्यातील एका समुहाने बर्फाचे गोळे, लाकडं, कोळसे ब्रिटिश सैनिकावर फेकले. त्यांनी घातलेल्या लाल रंगाच्या गणवेषावरून त्यांना "लाॅब्स्टर","खूनी पीठ" म्हणून डिवचले. काही सैनिकांनी आपल्या बंदूकाही सज्ज केल्या. शेवटी बोस्टन नरसंहारात पाच राज्यसैनिक, ४ पुरुष आणि १ मुलगा मारला गेला.



पॉल रेवरेने शांतीपूर्ण नागरिकावर झालेला गोळीबार व सैनिकांनी केलेल्या नरसंहार दाखविणारे एक चित्र रेखाटले. खरच असे घडले की नाही हे नक्की माहित नाही. खरे नसेलही पण पॉल रेवरे इंग्रजी लोकाविरुध्द नागरिकांच्या मनात द्वेष निर्माण करण्यात यशस्वी झाले.





१७७३ वर्षाच्या शेवटी चहाचे डबे घेऊन तीन ब्रिटिश जहाज बोस्टन बंदरांत पोहोचली. बोस्टन मधील बर्याच लोकांनी चहावरील कर भरायचा नाही...चहाच प्यायचा नाही असा निर्णय घेतला.

१६डिसेंबर १७७३ या दिवशी बोस्टनमधील एका मोठ्या अमेरिकन नागरिकांचा समुह जहाजावर चढला. या तीन समुहापैकी एका समुहाचे नेतृत्व पॉल रेवरे करीत होते. त्यांनी ३४२ चहाचे डबे उघडले आणि ते समुद्रात फेकून दिले.

१०मे १७७४ ला पाच हजार ब्रिटिश सैनिक बंदर बंद करण्यासाठी बोस्टनला पोहोचले. जोपर्यंत बोस्टनचे नागरिक चहावरील कर भरणार नाहीत तोपर्यंत बंदर खुले होणार नाही.



सैनिक बोस्टनमधे राहिले. पॉल रेवरे आणि समितीचे लोक, ज्यांना ग्रेट ब्रिटनचे वर्चस्व मान्य नव्हते, यांचे सैनिकाच्या हालचालीवर बारिक लक्ष होते. एप्रिल १७७५ च्या मध्यावर ब्रिटिश लेंक्झिगटन आणि का ॅनका ॅर्ड, मॅसाच्युसेट मधील "मिनटमैन" नावाच्या अमेरिकन सैनिकांवर हल्ला करणार आहेत अशी वार्ता पॉल रेवरेला समजली. त्या रात्री पॉल रेवरे व विलियम डावेस यांनी अमेरिकन सैनिकांना सावध करण्यासाठी तिथपर्यंत मजल मारली. इग्रजी लोक जमिनीवरून हल्ला करणार कि समुद्रमार्गे करणार याची पॉल रेवरेला कल्पना नव्हती. त्यांनी रा ॅबर्ट न्यूमन नावाच्या एका व्यक्तीला सांगितले की इंग्रज जमिनीवरून हल्ला करणार असतील तर एक कंदिल आणि समुद्र मार्गाने आले तर दोन कंदिल क्राइस्ट चर्चवर लावायचे.



चाल्स नदी पार करून पॉल रेवरेने बोस्टन सोडले. विलियम डावेसही शहराच्या गेटमधून बाहेर पडला. ते लेक्सिंग्टनमधे भेटले व तिथे आपल्या देशबांधवांना ब्रटिश आक्रमणाविषयी सावध केले. सॅम्युअल प्रेस्काटने त्यांना मदत केली. मग कानकार्डच्या रस्त्यावर पॉल रेवरेला ब्रिटिश अधिकार्यानी पकडले. इंग्रजांनी त्यांचा घोडा पळविला पण काही इजा केली नाही. विलियम डावेसने पण इतक्या वेगाने घोडा पळविला की ते घोड्यावरून पडून जायबंदी झाले. आता कानकार्डमधे अमेरिकन सैनिकांना सावध करण्यासाठी फक्त सॅम्युएलच प्रेस्काटच होता



लेक्सिंग्टन मधे सकाळी गोळीबार सुरु झाला. अमेरिकन नागरिकाची स्वातंत्र्यासाठी लढाई - क्रांतीयुध्द सुरू झाले.

४ जुलै, १७७६ रोजीफिलाडेल्फियामधे महाकांग्रेसमधे १३ राज्यांच्या प्रतिनिधीनी स्वतंत्रतेच्या घोषणेला मंजूरी दिली. घोषित करण्यात आले की ही १३ राज्ये पूर्ण स्वतंत्र आहेत. ब्रिटिश राजा किंवा ब्रिटिश शासनाचा अंमल त्याच्यावर असणार नाही.





युध्द चालू असतांना पॉल रेवरेने कॅसल द्विपवर बोस्टन किल्ल्याच्या कमानीमधे लेफ्टनंट - कर्नल म्हणून काम पाहिले. दारूगोळा बनविण्यासाठी त्यांनी एक कारखाना सुरू केला. त्यांनी तोफा पण बनविल्या. त्यांनी मॅसेच्युसेट राज्यासाठी तांब्याच्या तबकडीवर नक्षीकाम केले आणि कागदी नोटाही छापल्या.
ही लढाई १७८१ पर्यंत चालली. १७८३ मधे पॅरिस तहावर सह्या झाल्या आणि संसदेकडून नव्या संयुक्त राज्य अमेरिकेला मान्यता मिळाली.



युध्द संपल्यावर पॉल रेवरे आपल्या दुकानात चांदीचे दागिने घडविण्यासाठी परत गेले. त्यांनी चर्चमधे छपरापासून लटकविण्यासाठी मोठ्या घंटा बनविल्या. पत्ते, भिंतीवर लावायचे कागद, कापड याचा व्यापार केला. तांब्याच्या अनेक वस्तु बनविल्या. जहाजासाठी पुर्जे बनविले, अमेरिकन सैन्याच्या युध्द सामुग्रीला खालून  झाकण्यासाठी तांब्याचे पातळ पत्रे बनविण्यासाठी रोलिंग मिलची स्थापना केली.



जसे जसे वय वाढत गेले तसे तसे ते आपल्या नातवंडांच्या घोळक्यात राहू लागले. ते नातवंडांना अमेरिकन क्रांतीच्या आधीचा काळ, व क्रांतीच्या काळात त्यांनी केलेले प्रयत्न याबद्दलच्या गोष्टी सांगत असत. १० मे, १८१८ रोजी दीर्घ आजारानंतर त्याचा मृत्यू ओढवला. ते प्रतिभासंपंन्न होते परंतु लोक त्यांना एक अमेरिकन देशभक्त, ज्यांनी देशाला स्वातंत्र मिळवून देण्यासाठी पूर्णपणे झोकून दिले, म्हणून जास्त ओळखत होते.

## लेखकाचे निवेदन

क्राइस्ट चर्च आता ओल्ड नार्थ च्रच या नावाने परिचित आहे

स्वातंत्र्युध्यच्या आधी व युध्द सुरू असतांना अमेरिकन सैनिकांना मदत करण्यासाठी पॉल रेवरे यांनी खूप प्रवास केला. "बोस्टन टी पार्टी" नंतर लगेचच ते न्यूयार्क व फिलाडेल्फियाला गेले व बोस्टनच्या लोकांनी काय केले ते सर्व तेथिल लोकांना सांगितले. जेव्हा बोस्टन बंदर बंद करण्यात आले तेव्हाही न्यूयार्क आणि फिलाडेल्फियाला परत जाऊन तेथिल अमेरिकन लोकांना सावध केले. १७७२ मधे सुरू झालेल्या "सन्स आफ लिबर्टी" समुहाने विविध भागात व कॅलिफोर्नियामधे पत्राद्वारा अनेक समित्या स्थापन केल्या. प्रत्येक समितीने त्याना माहित असलेल्या इग्रजांबरोबर चालू असलेल्या संघर्षाची माहिती एकमेकांना कळविली. पा ॅ रेवरे नेहमी समितीची पत्रे घेऊन जात असत. त्यांनी सुरक्षा समितीला पत्र पोहोचविण्यासाठी प्रवास केला. त्यामुळे क्रांतीयुध्द सुरू असताना राज्याला सावधगिरीच्या सुचना देणे व त्यानुसार शासन करणे यासाठी मदत झाली. हेनफैड वाडस द्वारा (१८०७ - १८८२) यांनी "पॉल रेवरे की यात्रा" हे सांगणारे गीत लिहीले. त्यामुळे पॉल रेवरे यांना अधिक प्रसिध्दी मिळाली.



# महत्वाच्या तिथी

१७३५ :- मॅसेच्युसेट, बोस्टन येथे १ जानेवारी रोजी जन्म

१७४८ :- वडिलांच्या चांदीच्या दुकानात शिकवू म्हणून काम

१७३४ :- वडिल, अपोलोस रिवियोइरे ( १७२० मधे त्यांनी स्वत:चे नाव पॉल रेवरे ठेवले) ,
यांचे २२ जुलैला निधन झाले. पॉलने दुकान संभाळण्याची जबाबदारी उचलली.

१७५६ :- १८ फेब्रुवारी रोजी मॅसाच्युसेट रेजिमेंटमधे सामिल झाले व तोफखाना विभागात सेकंड लेफ्टनंट झाले.

१७५७ :- आगस्टमधे सारा बरोबर लग्न केले.

१७७० :- मे महिन्यात बोस्टन नरसंहारावर चित्र तयार केले.

१७७३ :- ३ मे ला साराचा मृत्यु

१७७३ :- २३ सप्टेबरला राहेल वाॅकर बरोबर लग्न

१७७३ :- बोस्टन टी पार्टी मधे सहभाग

१७७५ :- एप्रिल १८ च्या रात्री लेक्सिंग्टन, मॅसेच्यूसेटमधे ब्रिटिश सैनिकाच्या आक्रमणाची माहिती देण्यासाठी गेले.

१७७६ :- महाद्विपिय कांग्रेसने ४ जुलै रोजी स्वातंत्राची घोषणा मान्य केली.

१८१३ :- २७ जुन रोजी पत्नी राहेलचे निधन

१८१८ :- बोस्टन, मॅसेच्युसेटमधे १० मे रोजी निधन